# मोरयाची अवयव शोभा!

(माऊलींचे गणेश वर्णन- पुढे सुरु)

शब्द ब्रह्मालाच श्रीगणेशांचे मूर्त रूप म्हणून मांडल्यावर भगवंतांचे समस्त अवयव रुपात माऊली विविध शास्त्र पद्धतींचे निरुपण करीत आहेत.

स्मृती तेची अवयव! देखा अंगिकभाव!

तेथ लावण्याची ठेव! अर्थशोभा!

स्मृती ह्याच भगवंताच्या अवयव आहेत. अनेकार्थाने ही संगती समजून घ्यायला हवी. स्मृतीचा संबंध कृतीशी आहे. कृतीची नियमावली रूपातच 'स्मृती' निर्माण झाल्या. त्या स्मृती मोरयाच्या अवयव आहेत. कारण कृतीचा संबंध अवयवांशी आहे.

यात 'अर्थशोभा' हे लावण्या होय. अवयवांचे खरे सौंदर्य त्यांच्या केवळ रेखीव असण्यात नाही. म्हातारपणीही नाक-डोळे तसेच रेखीव असतात. पण त्यातील आकर्षकता लोप पावते. 'लावण्य' ही वेगळी गोष्ट आहे. ती अंतरंग वैभवाची गोष्ट आहे.

श्रुतीस्मृतीतील 'अर्थ' हाच लावण्य आहे. दृश्य असतात 'शब्द' मात्र ग्राह्य असतो अर्थ. स्मृतीतील श्रुतीतील 'अर्थ' महत्वाचा. येथे 'अर्थ' शब्दाचा भावार्थ आहे 'मिळवण्याची गोष्ट' पुरुषार्थ शब्दात 'अर्थ' शब्दाचा जो अर्थ अभिप्रेत असतो तोच येथे आहे. पुरुषार्थ म्हणजे पुरुषाने मिळविण्याच्या गोष्टी काय मिळवायचे? तर धर्म, अर्थ, काम, मोक्ष हेच पुरुषार्थ.

यांच्या प्राप्तीने जीवनात येणारी 'परमतृप्तता' हेच लावण्याचे स्वरूप आहे. हे मिळाले की माणूस तृप्त होतो. काही मिळवायचे असले की येणारी चिंता लावण्याचा विनाश करते. भगवान 'आप्तकाम' असल्याने नित्य तृप्त असाणा-या भगवंताची 'लावण्यशोभा' याच कारणाने अखंड आहे.

मग अशा लावण्यमय स्मृती अवयवांना सुशोभीन करतात पुराणांची अवयव 'अलंकार' रचना पुराणांची संख्या अनेक तसे अलंकारही अनेक. अलंकार मुळच्या सौंदर्यास खुलवतात. तशी पुराणे श्रुतिस्मृती प्रतिपादित सिद्धांतानाच पोषक असतात अत: त्यांना अलंकार म्हणतात.

माऊली म्हणते-

अष्टादश पुराणे तिची मणिभूषणे!

पदपद्धती खेवणे प्रमेय रत्नांची!

अठराही पुराणे हेच अलंकार. त्यातील प्रमेये हीच रत्ने आणि पदपद्धती हेच कोंदण.

पुराणांचे प्रमेय स्वरूप परमात्म तत्वाचे विवेचन हे रत्नवत दैदीप्यमान आहे. ते 'कथनीय' आहे. महत्व रात्नालाच असते. कथांना नव्हे तर कथनीयाला महत्व असते. पुराण कथा 'कशा आहेत?' पेक्षा 'त्या तशा का आहेत?' याचा अभ्यास केला तरच पुराणकथांचा खरा उपयोग होऊ शकेल. अन्यथा त्या कथा निरुपयोगी, अजब, अत्कर्य वाटतात. रत्नाचेही असेच असते. हिरा तेव्हाच चमकतो जेव्हा त्याला पैलू पाडणारा रत्नपारखी हाताळतो. अन्यथा आपल्याला 'कोराहीरा' सापडला तर आपण त्याचे महत्वच  न कळल्याने फेकुनच देऊ. पुराणकथा अशाच असतात. त्यातील तात्पर्य कळले तरच त्याचे तेज प्रगटते. अन्यथा त्या भाकडकथा म्हणणा-या पारखहीनाचीच संख्या अधिक असते.

अशा रत्नांना सरळ धारण करता येत नाही. त्यासाठी त्यांना कोंदणात बसवावे लागते. पुराणांची 'पदपद्धती' अर्थात 'कथारूप मांडणी' हे कोंदण होय.

कोंदणाला पाहायचे नसते. पाहायचे असते 'रत्न' पण रत्न सरळ न गळ्यात घालता येते ना हातात. त्याला अंगठी व लॉकेट रुपी कोंदण अनिवार्य असते. कथांची मांडणी अशीच असते. कथा हे कोंदण आहे. 'कथनीय' हे रत्न तेच पाहायचे. पण कोंदणाशिवाय ते शक्य नाही. जसे तांदूळ पेरतांना साळीसकट पेरावे लागतात. ते उबवतातही साळीसकट पण साळीचे प्रयोजन तसे काही नसते. मात्र त्याच्या शिवाय तांदूळ उगवतही नाहीत. कथांची रचना तशीच असते. कथा लक्षात ठेवायला सोप्या असतात. मात्र लक्षात ठेवायचे असते ते 'कथनीय'.

मग माऊली म्हणते-

'पदबंध नागर तेचि रंगाथिले अंबर!'

शब्दांना माऊली वस्त्र म्हणते. शब्दालंकार इ. ना काव्यशरीर म्हणतात. तेच आरंभी दिसतात तसे शब्दच आधी दिसतात, प्रथमदर्शनी लक्ष वेधक शब्द-पद हेच अंबर म्हणजे वस्त्र होय.

देखा काव्य नाटका!

जे निर्धारिता स कौतुका!

त्याची रुणझुणती क्षुद्रघंटिका!

अर्थध्वनी!

काव्य, नाटक इ. साहित्यप्रकारांना माऊली  क्षुद्रघंटिका म्हणतात. छोटी छोटी घुंगरे. वस्त्राला दागिन्यांना लावलेल्या या घंटिका जशा 'मनोल्हादक' वाजतात तसे हे साहित्यप्रकार मनाला आल्हादित करतात.

या सगळ्या वर्णनातील सगळ्यात सुंदर मांडणी म्हणजे-

तेथ व्यासादिकांची मती!

तेचि मेखला मिरवती!

भ. व्यासादिकांच्या बुद्धीला माऊली मेखला म्हणत आहे.

मेखला म्हणजे कंबरपट्टा. तो कमरेवर अर्थात शरीराच्या मध्यभागावर, अर्ध्याभागावर असतो. अर्थात व्यासादिकांची बुद्धीही मोरयाच्या या स्वरूपाच्या अर्ध्याभागावरच पोहचते.

केवळ सगुण, साकार रुपालाच ती गवसणी घालते. आळवते , आवळते अत: मेखला. अर्ध्या भागालाच का? तर सगुणत्वालाच गवसणी घालता येते. निर्गुणत्व हा वर्णनाचा नव्हे तर अनुभवाचा प्रान्त. तेथे बुद्धीचा आवाका नाही तर विलयच अपेक्षित आहे अतः बुद्धी बुद्धीपतीच्या मेखला रुपात मांडणे माऊलीची अनुपमेय रचना होय.

असा अलौकिक मोरया माऊलींनी शब्दबद्ध केला. माऊलींचा मोरया 'षडभूज' आहे. सहा हातांचा. त्या हातांचेही माऊलींनी केलेले वर्णन अद्भुत आहे. कसे? पुढील लेखात पाहू --------

जय गणेश!